महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतन बाबीकरिता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ या नऊ महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः-राअआ-२०१७/प्र.क्र.५५/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. २६ एप्रिल, २०१७.

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि- २०१७/प्र.क्र. ३१/का-७, दि. १९ एप्रिल, २०१७.
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दि. ०१ एप्रिल, २०१७.
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि. १८ एप्रिल, २०१७.
(४) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१/ का-४/ २०१६-१७, दि. १९/०४/२०१७.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ या नऊ महिन्यांचा खर्च भागविण्याकरिता मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगासाठी "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.६६,६०,०००/- (अक्षरी रू.सहासष्ट लक्ष साठ हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र. (३) येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पित तरतुदीच्या ८०% च्या मर्यादेत मंत्रालयीन विभागांना अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी ८०% च्या मर्यादेत राहून माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ या नऊ महिन्यांकरिता ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली रू.५३,२८,०००/-(अक्षरी रू.त्रेपन्न लक्ष अठ्ठावीस हजार फक्त) इतके अनुदान खाली दर्शविलेल्या निधी विवरणाप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| **“२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९** (अनिवार्य) **, ३६, सहायक अनुदाने (वेतन)”** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशीर्ष** | **सन २०१७-१८ साठी अर्थ संकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.)** | **पहिल्या नऊमाही साठी वितरित अनुदान (८०%) ( माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७) (रु.)** | **माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ करिता मंजूर अनुदान (प्रतिमाह ) (रु.)** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | ३६,सहायक अनुदाने(वेतन) | ६६,६०,०००/- | ५३,२८,०००/- | ५,९२,०००/- |
| | **एकूण** | **६६,६०,०००/-** | **५३,२८,०००/-** | **५,९२,०००/-** |

**३.** सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१७-१८ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र. (२) व (३) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.

**४.** उपरोक्त रक्कम “२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

**५.** “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग (१) क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दि. ०१ एप्रिल, २०१७. आणि (२) अर्थसं- २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३,दि. १८ एप्रिल, २०१७ मधील अटींची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. ”

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२६१५०८११९४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shamlal R Chaure

Digitally signed by Shamlal R Chaure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f297dc66bbf139a70b9a7f405528e318890087680cc7a9c0ce19f213232572bd, cn=Shamlal R Chaure
Date: 2017.04.26 15:12:32 +05'30'

**(श्या. र. चौरे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५) अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) निवडनस्ती (कार्यासन-९).